**ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी सभेने पारीत केलेला ठराव क्र. ३६६, दिनांक ०८.०७.२०१६ निलंबित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ठामपा-२११६/प्र.क्र.४५०/नवि-२३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- ११ जानेवारी, २०१७

**संदर्भ** :-

आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांचे पत्र क्र. ठामपा/कार्मिक /आयुक्त-८१४/३०५४, दिनांक २६.०९.२०१६

**प्रस्तावना :** -

ठाणे महानगरपालिकेने श्री.विलास रोहिदास साळुंखे, लिपीक, यांच्या संदर्भात स्थायी समितीने ठराव क्र. ३६६, दिनांक ०८.०७.२०१६ रोजी पारीत केलेला ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील ४५१ मधील तरतुदीनुसार विखंडीत करण्याबाबत आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये विनंती केली आहे.

श्री.विलास रोहिदास साळुंखे, लिपिक हे ठाणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर जकात विभागात कार्यरत असतांना दिनांक २८.०७.१९९८ रोजी श्री. अरविंद मुकादम, ट्रान्सपोर्ट यांचे वाहनाची तपासणी न करता त्यांच्या मालावर कमी जकात आकारणी करुन माल सोडल्याने त्यांना दिनांक ३१.०७.१९९८ अन्वये निलंबित करण्यात आले होते. तद्नंतर त्यांचेविरुध्द दिनांक ३१.०७.१९९८ रोजी कळवा पोलिस स्टेशन येथे भा.द.वि.सं. ४२०,१२० (ब) लाचलुचपत प्रतिबंधक कायदा ७,१२,१३ (१) (ड) नुसार गुन्हा नं. ६७/९८ अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला.

या प्रकरणी गुन्हे अन्वेषण विभाग, गुन्हे शाखा ठाणे यांनी दिनांक २७.०२.१९९९ अन्वये श्री. विलास साळुंखे, लिपिक यांचेविरुध्द न्यायालयात दोषारोप पाठविण्यास मंजुरी मिळण्यास विनंती केली होती.

त्यानुसार महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ५३ अन्वये प्रस्ताव महासभेच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला असता महासभेने ठराव क्र. २१, दिनांक १९.०४.१९९९ अन्वये श्री. सांळुखे यांचेविरुध्द न्यायालयात अभियोग दाखल महानगरपालिकेने मंजुरी दिली.

तद्नुषंगाने ठाणे महानगरपालिकेने दिनांक ३०.०६.१९९९ नुसार श्री. सांळुखे यांचेविरुध्द न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्यास गुन्हे अन्वेषण विभाग, ठाणे यांना मान्यता देण्यात आली होती. श्री. विलास साळुंखे, लिपिक यांना ठाणे महानगरपालिकेने दिनांक १९.०४.१९९९ अन्वये विभागीय चौकशी अहवालावरील निर्णय बंधनकारक राहील या अटी व शर्तीवर महापालिका सेवेत पुर्नस्थापित करण्यात आले होते.

तद्नुषंगाने श्री.विलास सांळुखे, लिपिक यांचेविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम १९७९ चे नियम ८ अन्वये सदर प्रकरणी विभागीय चौकशी प्रस्तावित करण्यात आली होती. सदर विभागीय चौकशी अंतर्गत श्री. सांळुखे यांचेवर दोन दोषारोप ठेवण्यात आले होते.

श्री.विलास साळुंखे, लिपिक यांना दिनांक २२.१२.१९९८ अन्वये बजावण्यात आलेल्या ज्ञापनास अनुसरुन श्री.साळुंखे यांनी दिनांक ०७.०१.१९९८ रोजी खुलासा सादर केला असता, आयुक्त, ठाणे महानगरपालिका तथा शिस्तभंग विषयक प्राधिकारी यांनी श्री.साळुंखे यांचा खुलासा अमान्य करुन त्यांचेविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम १९७९ चे नियम ८ अन्वये विभागीय चौकशी करण्याचे आदेश दिले. याप्रकरणी चौकशीची प्रक्रिया पूर्ण करुन सादर केलेल्या अहवालात श्री. साळुंखे यांचेविरुध्द विभागीय चौकशीत ठेवण्यात आलेले दोन्ही दोषारोप सिध्द होत असल्याचे निष्कर्ष काढले आहेत.

विभागीय चौकशीवर अंतिम निर्णय घेण्यापूर्वी श्री.विलास साळुंखे, लिपिक यांना महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम १९७९ चे नियम ११ नुसार त्यांना त्यांचे निवेदन सादर करणेबाबत कळविण्यात आले होते. त्यानुषंगाने श्री. साळुंखे यांनी त्यांचे निवेदन दिनांक २४.०३.२०११ अन्वये सादर केले.

सामान्य विभागाच्या शासन निर्णय दिनांक २३.०७.२००७ अन्वये श्री.विलास सांळुखे, लिपिक यांचेविरुध्दच्या विभागीय चौकशी प्रकरणी अंतिम निर्णय घेण्यात आला व दिनांक १४.१०.२०१५ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले होते.

उपरोक्त आदेशाविरुध्द श्री. साळुंखे लिपिक यांनी दिनांक ०५.११.२०१५ रोजी ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी समितीकडे अपिल सादर केले असता स्थायी समितीने ठराव क्र. ३६६, दिनांक ०८.०७.२०१६ पारित केला होता.

ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी समितीने पारीत केलेला ठराव क्र. ३६६ दिनांक ०८.०७.२०१६ हा प्रशासनाच्या प्रस्तावानुसार नसल्याने व सदरचे प्रकरण न्याय प्रविष्ठ असल्याने स्थायी समितीने पारित केलेल्या ठरावाप्रमाणे कार्यवाही करणे योग्य नसल्याने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१ अन्वये दिनांक २६.०९.२०१६ च्या पत्रान्वये विखंडीत करण्याची विनंती आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांनी केली आहे.

दिनांक २३.०७.२००७ अन्वये श्री.विलास सांळुखे, लिपिक यांचेविरुध्दच्या विभागीय चौकशी प्रकरणी अंतिम निर्णय घेण्यात आला व दिनांक १४.१०.२०१५ अन्वये अंतिम आदेश निर्गमित करण्यात आला. श्री.विलास साळुंखे यांचेविरुध्द दाखल करण्यात आलेले केलेल्या गुन्हयाबाबतचे प्रकरण न्याय प्रविष्ठ आहे.

तसेच या प्रकरणी महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील तरतुदी खालील प्रमाणे आहेत:-

- महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ५६ (१) मधील (क) मध्ये आयुक्तास महानगरपालिकेने नेमलेल्या कोणत्याही अधिकाऱ्यावर पोट कलम (२) खंड अ, ब, ड, ई व फ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या शास्तीपैकी कोणतीही शास्ती लावता येईल अशी तरतुद आहे.
- महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ५६ (२) अन्वये ज्या शास्ती लादता येतील त्या नमुद केल्या आहेत. यामध्ये उपरोक्त नमुद अ,ब, ड, ई व फ या विनिर्दिष्ट आहेत.

- महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील तरतुदीमध्ये निलंबन, वेतनवाढ रोखणे या सारख्या शिक्षेच्या विरुध्द स्थायी समितीसमोर अपील करण्याची कोणतीही तरतुद नमूद नाही. तसेच त्यामुळे या शिक्षांच्या संदर्भात स्थायी समितीने केलेला ठराव स्थायी समितीच्या अनाधिकारात ठरतो.

या बाबींचा विचार करुन शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**<u>शासन निर्णय:-</u>**

ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी समितीने पारीत केलेला ठराव क्र. ३६६ दिनांक ०८.०७.२०१६ अनाधिकारात असल्याने उक्त ठराव ठराव क्र. ३६६, दिनांक ०८.०७.२०१६ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (१) अन्वये प्रथमत: निलंबित करण्यात येत आहे.

सदर निलंबना प्रकरणी सबंधितांना अभिवेदन करावयाचे असल्यास त्यांना निलंबन आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत शासनास अभिवेदन करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१७०११२११४५०१११२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने**

Ajit Malhari Kawade

Digitally signed by Ajit Malhari Kawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=597d3c4c02c1add96119d79fc4b21063ef289863535a77211cf42daa12e539dd, serialNumber=49349d578c976e0d05a9793ef412604378bdf9fed13d605caba002427a7c370b, cn=Ajit Malhari Kawade
Date: 2017.01.12 11:52:38 +05'30'

**(अजित म.कवडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
३) सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, ठाणे महानगपालिका, जि. ठाणे
५) उप सचिव (श्री.परशुरामे), नगर विकास विभाग, यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) महापालिका सचिव, ठाणे महानगपालिका
७) निवड नस्ती (नवि-२३) नगर विकास विभाग